**अर्थसंकल्पीय अनुदान सन २०२३-२४ मधुन आर.आर.(आबा).पाटील सुंदर गाव पुरस्कार योजनेतर्गत सन २०२०-२१ व सन २०२१-२२ करिता निवड झालेल्या सुंदर गांव ग्रामपंचायतींना निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**ग्राम विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः सुंगायो-२०२३/प्र.क्र.१५६/योजना-११**

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ

फोर्ट, मुंबई-४०० ००१.

दिनांक : - २७ मार्च, २०२४.

<u>वाचा :</u>

**(१) ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः स्माग्रायो-२०१५/प्र.क्र.१५१-अ/योजना-१, दि.२१.११.२०१६.**

**(२) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३.**

**(३) ग्रामविकास विभाग शासन निर्णय क्रमांक : सुंगायो-२०२३/प्र.क्र.१५६/योजना-११ दि.२३.०६.२०२३.**

**(४) ग्रामविकास विभाग शासन निर्णय क्रमांक : सुंगायो-२०२३/प्र.क्र.१५६/योजना-११ दि.११.०९.२०२३.**

**(५) ग्रामविकास विभाग शासन निर्णय क्रमांक : सुंगायो-२०२३/प्र.क्र.१५६/योजना-११ दि.२०.०२.२०२४.**

**(६) ग्रामविकास विभाग शासन निर्णय क्रमांक : सुंगायो-२०२३/प्र.क्र.१५६/योजना-११ दि.२०.०३.२०२४.**

<u>प्रस्तावना :</u>

शासन निर्णय क्र.स्माग्रायो-२०१५/प्र.क्र.१५१-अ/योजना-१, दि.२१ नोव्हेंबर, २०१६ अन्वये, आर.आर.(आबा) पाटील सुंदर गांव पुरस्कार योजनेसाठी प्रथम स्तरावरील तालुका सुंदर गाव व द्वितीय स्तरावरील जिल्हा सुंदर गाव ग्रामपंचायतींना रोख स्वरुपात पारितोषिक वितरण करण्यात येईल अशी तरतूद आहे.

२. आर.आर.(आबा) पाटील सुंदर गांव पुरस्कार योजनेअंतर्गत राज्यातील ३५१ तालुका सुंदर गाव व ३४ जिल्हा सुंदर गाव म्हणून निवड झालेल्या ग्रामपंचायतीना अनुक्रमे रु.१०.०० लक्ष व रु.४०.०० लक्ष अशी पारितोषिकांची रक्कम अदा करण्यात येते.

३. सन २०२३-२४ करिता आर.आर.(आबा), पाटील सुंदर गांव पुरस्कार योजनेतर्गत (२५१५१६७७) या लेखाशीर्षाखाली रुपये ८०.०० कोटी निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. सदर लेखाशीर्षांतर्गत वित्त विभागाने उपलब्ध करुन दिलेल्या निधीपैकी रु.७,६०,०८,७५२/- (रु.सात कोटी साठ लक्ष आठ हजार सातशे बावन्न) निधी दि.२३.०६.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये, रु. ८,००,००,००० /- (रु.आठ कोटी) इतका निधी दि.११.०९.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये, रु. २३,६०,००,०००/- (रु. तेवीस कोटी साठ लक्ष) इतका निधी दि.२०.०२.२०२४ च्या शासन निर्णयान्वये व रु.११,९०,००,०००/- (रुपये अकरा कोटी नव्वद लक्ष रु.) इतका निधी दि.२०.०३.२०२४ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. सद्यस्थितीत जिल्हा परिषदांकडून प्राप्त मागणीनुसार उपलब्ध असलेला रु.४,२०,००,०००/- (रु. चार कोटी वीस लक्ष फक्त) इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

आर.आर.(आबा) पाटील सुंदर गांव पुरस्कार योजनेअंतर्गत सन२०२०-२१ व सन २०२१-२२ आर्थिक वर्षाकरिता तालुकास्तर व जिल्हा स्तर पुरस्कार प्राप्त झालेल्या ग्रामपंचायतींना पुरस्काराची रक्कम अदा करण्यासाठी प्राप्त मागणीनुसार संबंधित जिल्हापरिषदांना खालीलप्रमाणे निधी वितरित करण्यात येत आहे.

**सन २०२०-२१ आर्थिक वर्षाकरिता**

| अ.क्र. | जिल्हा | वितरित करावयाची रक्कम |
|---|---|---|
| १. | जळगांव | रु. १९०.०० लक्ष (तालुकास्तर+जिल्हास्तर) |
| | **एकूण** | **रु. १९०.०० लक्ष** |

**सन २०२१-२२ आर्थिक वर्षाकरिता**

| अ.क्र. | जिल्हा | वितरित करावयाची रक्कम |
|---|---|---|
| १. | जळगांव | रु. १५०.०० लक्ष (तालुकास्तर) |
| २. | नांदेड | रु. ४०.०० लक्ष (जिल्हास्तर) |
| ३. | बुलढाणा | रु. ४०.०० लक्ष (जिल्हास्तर) |
| | **एकूण** | **रु. २३०.०० लक्ष** |

२. आर.आर.(आबा) पाटील सुंदर गाव पुरस्कार योजनेंतर्गत वितरित करावयाची एकूण रक्कम पुढीलप्रमाणे आहे :-

| अ.क्र. | वर्ष | वितरित करावयाची रक्कम |
|---|---|---|
| १. | २०२०-२१ | १९०.०० लक्ष (रु. १,९०,००,००० /-) |
| २. | २०२१-२२ | २३०.०० लक्ष (रु. २,३०,००,००० /-) |
| | **एकूण** | **४२०.०० लक्ष (रु. ४,२०,००,००० /-)** |

३. उपरोक्त निधी वितरीत करण्यासाठी संबंधित जिल्हा परिषदांच्या मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांनी वितरीत करावयाच्या रकमा कोषागारातून काढुन संबंधितांना प्रदान करण्याची व्यवस्था करावी. याबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद हे नियंत्रक अधिकारी राहतील.

४. निधी वितरीत केल्यानंतर मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी स्मार्ट ग्राम पुरस्कार प्राप्त ग्रामपंचायतींनी पारितोषिकाचा निधी नाविण्यपूर्ण विकास कामासाठी खर्च केला आहे, याबाबतची माहिती तातडीने सादर करावी. शासन निर्णय क्रमांक-स्माग्रायो-२०१५/प्र.क्र.१५१-अ/योजना-११, दि.१६.४.२०१८ मधील तरतुदीन्वये, नाविण्यपूर्ण कामाऐवजी अन्य विकास कामे ज्या स्मार्ट ग्रामपंचायतींना पूर्ण करावयाची आहेत अशा विकास कामांकरिता शासनाची पूर्व परवानगी घेण्यात यावी.

५. नियंत्रक अधिकाऱ्यांनी या योजनेकरिता झालेल्या /होणाऱ्या खर्चाचा आढावा घेऊन महालेखापाल कार्यालयातील खर्चाच्या नोंदीशी ताळमेळ घेऊन प्रत्यक्ष खर्च व महालेखापाल कार्यालयास झालेला खर्च यामध्ये तफावत राहणार नाही, याबाबत दक्षता घ्यावी. सदर अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालयास सादर करावे व त्याची प्रत शासनास पाठवावी. तसेच सदर योजनांतर्गत आजपावेतो वितरित केलेल्या निधीमधून शिल्लक असलेला निधी जिल्हा परिषंदांनी प्रशासकीय खर्च, IEC, प्रचार व प्रसिध्दी, अभ्यास दौरा इ.खर्च भागविण्याकरिता उपयोगात आणावा व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

६. सदर खर्च सन २०२३-२४ करिता लेखाशीर्ष मागणी क्रमांक-एल-३, २५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, १९८-ग्रामपंचायतींना सहाय्य, (००) (०१) स्मार्ट ग्राम योजनेची अंमलबजावणी करण्यासाठी पंचायत राज संस्थाना सहाय्यक अनुदान (कार्यक्रम) -३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (२५१५ १६७७) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३ अन्वये दिलेल्या सूचनांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३२७१५५५०५६८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KALU GONYA VALVI

Digitally signed by KALU GONYA VALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=714701fc3db9c38a46f4cd82e1e450b51a9e92eede8c323934f82edb538d3b20, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8C5D0F275C3D9A21DB07FECF7919C2D83796E88930D62D44E7A4A6D4CBEE7E0E, cn=KALU GONYA VALVI
Date: 2024.03.27 17:40:35 +05'30'

**( का.गो.वळवी )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.उपमुख्यमंत्री तथा गृह मंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा.उपमुख्यमंत्री तथा वित्त मंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मा.मंत्री(ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

६. सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
७. मा.विरोधी पक्ष नेता (विधान परिषद/विधानसभा), यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
८. सर्व मा.विधानसभा / विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
९. मा.मुख्य सचिव, यांचे वरिष्ठ स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई,
१०. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन प्रशासकीय विभाग (सर्व),
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपूर,
१२. अधिदान व लेखा अधिकारी,महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१३. निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
१४. मा.अध्यक्ष, जिल्हा परिषद (सर्व),
१५. विभागीय आयुक्त, (सर्व),
१६. जिल्हाधिकारी, (सर्व),
१७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व),
१८.जिल्हा कोषागार अधिकारी(सर्व),
१९. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व),
२०. सर्व जिल्हा परिषदांचे उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत),
२१.. अवर सचिव, वित्त विभाग (व्यय-१५),मंत्रालय, मुंबई-३२,
२२. कक्ष अधिकारी (वित्त -१) ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई,
२३. कक्ष अधिकारी (रोख शाखा), ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
२४. निवड नस्ती (योजना-११).

.